**तहसिलदार संवर्गातील अधिका-यांची पदस्थापना**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्र.बदली-२०२५/प्र.क्र.८४/ई-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १० जून, २०२५

**संदर्भ**:- १) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४(४) व ४(५) व महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी, सेवेतून काढून टाकणे) नियम, १९८१ च्या नियम-४० मधील परिशिष्ट २ मधील विहित अटी व शर्तींना अधीन राहून **श्रीमती स्वप्नाली डोईफोडे, तहसिलदार (संगायो), अंधेरी यांची सक्षम प्राधिकारी क्र.८, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, बांद्रा, जि.मुंबई उपनगर या रिक्त पदावर ३ वर्षाच्या कालावधीसाठी सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.**

२. सदरील आदेश तात्काळ अंमलात येत असून उपरोक्त नमूद अधिकारी यांनी त्यांना देण्यात आलेल्या पदावर तात्काळ रुजू व्हावे. संबंधीत अधिकारी यांना कार्यमुक्त करण्यात आल्याचा दिनांक तसेच नवीन नियुक्तीच्या जागी हजर झाल्याचा दिनांक याबाबत e3.revenue@maharashtra.gov.in या ईमेलवर / टपालाद्वारे शासनास त्वरीत कळवावे.

३. सक्षम प्राधिकारी क्र.८, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, बांद्रा, जि.मुंबई उपनगर या कार्यालयातील प्रतिनियुक्तीच्या अनुषंगाने श्रीमती स्वप्नाली डोईफोडे, तहसिलदार (संगायो), अंधेरी यांच्या सेवा अपर मुख्य सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहेत.

४. श्रीमती स्वप्नाली डोईफोडे, तहसिलदार (संगायो) अंधेरी यांनी पुढील सुचनांसाठी अपर मुख्य सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई यांचेकडे हजर व्हावे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्र २०२५०६१०२०१८०९३३१९ असा आहे. हे शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT SOPANRAO DESHMUKH

Digitally signed by AJIT SOPANRAO DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=d36a0a6455652c60ea76104dd537113a9ca67ab14a315b9cefc36fc9be2915f8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=704CB545C50221B15CDE7CCB8854E694C765DFB3A0240E891EBFB56EE79E3440, cn=AJIT SOPANRAO DESHMUKH
Date: 2025.06.10 20:18:51 +05'30'

**(अजित देशमुख)**
**शासनाचे सह सचिव**

**प्रति,**

- अपर मुख्य सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई
- विभागीय आयुक्त, कोकण.

**प्रत,**

- मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. उप मुख्यमंत्री (नगरविकास) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
- संबंधित जिल्हाधिकारी.
- प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.
- संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
- संबंधित अधिदान व लेखा अधिकारी.
- संबंधित आहरण व संवितरण अधिकारी.
- अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- संबंधित तहसिलदार (संबंधित विभागीय आयुक्त यांचेमार्फत).
- सह सचिव (ई-३) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- निवडनस्ती (ई-३).